महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील सेवानिवृत्त अधिकारी/ कर्मचारी यांच्या दिनांक २३/०३/२०१७ ते दिनांक ३०/११/२०१७ या कालावधीतील सेवानिवृत्ती लाभांसाठी प्राधिकरणाला निधी वितरीत करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बजेट-१४१९/प्र.क्र.९०/पापु-२३**
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग, क्रॉफर्ड मार्केट जवळ, नवीन मंत्रालय इमारत, मुंबई ४०० ००१
तारीख: २४ जानेवारी, २०२०.

वाचा :-

१) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः** मजीप्रा-२०१४/प्र.क्र.३३(अ)/पापु-२३, दिनांक २३/०३/२०१७.
२) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः** मजीप्रा-१११७/प्र.क्र.२३५/पापु-२३, दिनांक ०७/०९/२०१८.

प्रस्तावना :-

महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील अधिकारी/ कर्मचारी यांचे वेतन व भत्ते तसेच निवृत्तीवेतन यांचे दायित्व शासनाने संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये स्वीकारले असून, शासन निर्णयातील तरतुदीनुसार महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे ई.टी.पी. व तांत्रिक सेवा शुल्कापोटी प्राप्त होणारे दरमहा उत्पन्न शासनाकडे जमा करण्यात येते. याच शासन निर्णयातील तरतुदीनुसार महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील अधिकारी/ कर्मचारी यांचे नियमित वेतन व भत्ते आणि निवृत्तीवेतन यावरील खर्च भागविण्यासाठी विभागस्तरावर स्वतंत्र लेखाशीर्ष निर्माण करण्याचे व त्यामध्ये आवश्यकतेप्रमाणे निधीची तरतूद करण्याचे निश्चित केले आहे.

महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील सेवानिवृत्त अधिकारी/ कर्मचारी यांना सेवानिवृत्तीचे लाभ देण्याकरिता प्राधिकरणाला अनुदान देण्याच्या दृष्टीने आर्थिक तरतूद करण्याकरिता संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये तात्पुरत्या स्वरूपात नवीन लेखाशीर्ष प्रधान महालेखाकार कार्यालयाच्या व वित्त विभागाच्या सहमतीने निर्माण करण्यात आले आहे.

महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील सेवानिवृत्त अधिकारी/ कर्मचारी यांना दिनांक २३/०३/२०१७ ते दिनांक ३०/११/२०१७ या कालावधीतील सेवानिवृत्ती वेतनाचे लाभ अदा करण्यासाठी प्राधिकरणाला निधी उपलब्ध करून देण्याकरिता विधिमंडळाच्या सन २०१९ च्या हिवाळी अधिवेशनामध्ये पुरवणी मागणीचा प्रस्ताव वित्त विभागास सादर करण्यात आला होता. मागणी केलेल्या निधीपैकी रु. २००.०० कोटी इतका निधी पुरवणी मागणीद्वारे मंजूर करून महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाला वितरीत करण्यास वित्त विभागाने सहमती दिली आहे. मान्यता दिलेल्या रकमेपैकी रक्कम रु. १३५.०० कोटी ही निवृत्तीवेतनाचे लाभ अदा करण्यासाठी उपलब्ध करून दिली आहे. त्यानुषंगाने महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील सेवानिवृत्त अधिकारी/ कर्मचारी यांच्या दिनांक २३/०३/२०१७ ते दिनांक ३०/११/२०१७ या कालावधीतील सेवानिवृत्ती लाभांसाठी रुपये १३५.०० कोटी अनुदान प्राधिकरणाला वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील सेवानिवृत्त अधिकारी/ कर्मचारी यांच्या दिनांक २३/०३/२०१७ ते दिनांक ३०/११/२०१७ या कालावधीतील सेवानिवृत्ती लाभांसाठी प्राधिकरणाला रक्कम रु. १३५,००,००,०००/- (अक्षरी रुपये एकशे पस्तीस कोटी फक्त) एवढे अनुदान "मागणी क्रमांक वाय-२, २२१५- पाणी पुरवठा व स्वच्छता, १९९- इतर अशासकीय संस्थाना सहाय्य, ०१- इतर अशासकीय संस्थाना सहाय्य, (०१) (०४) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे वर्ग झालेल्या शासकीय कर्मचाऱ्यांना निवृत्ती वेतनाचे लाभ मंजूर करण्यासाठी शासकीय अनुदान (२२१५A०५२) (अनिवार्य/ दत्तमत), ३१- सहाय्यक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षामधून खालील अटींच्या अधीन राहून मंजूर व वितरीत करण्यात येत आहे.

१) सदर अनुदान हे फक्त महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील सेवानिवृत्त अधिकारी/ कर्मचारी यांच्या दिनांक २३/०३/२०१७ ते दिनांक ३०/११/२०१७ या कालावधीतील सेवानिवृत्ती लाभांसाठी मंजूर असल्यामुळे या अनुदानमधील रकमेचा खर्च त्याच कामांसाठी होईल याची दक्षता सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी घ्यावी.

२) या निधीचा अन्य बाबींवरील खर्च (विनियोग) ही वित्तीय अनियमितता समजण्यात येईल व अशा कृतीसाठी संबंधित अधिकारी/ कर्मचारी शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र राहील.

३) वितरीत अनुदानाच्या रकमेचे स्वतंत्र लेखे ठेवण्यात येईल.

४) अनुदानाची रक्कम ज्या करीता मंजूर व मुक्त करण्यात आली आहे, त्या विनिर्दिष्ट प्रयोजनाकरीताच दिनांक ३१ मार्च, २०२० पर्यंत खर्च करावी.

५) वितरीत अनुदानातून होणाऱ्या वाटपाची माहिती महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने वेळोवेळी शासनास कळवावी.

६) मुंबई वित्तीय नियम, १९५९ मधील जोडपत्र २ मधील नियम क्रमांक ३ नुसार प्राधिकरणाचे लेखे संबंधित कागदपत्रांसह निरीक्षणाकरिता महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने सादर करावेत.

७) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाला शासनाकडून जी अनुदाने प्राप्त झाली आहेत किंवा जी अनुदाने यापुढील कालावधीत प्राप्त होतील त्या अनुदानाची उपयोगिता प्रमाणपत्रे महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने द्यावयाची आहेत. संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी उपयोगिता प्रमाणपत्रात दर्शविलेल्या मंजूर व वितरीत अनुदानाच्या रकमा तसेच खर्चाच्या रकमा प्रमाणित करून स्वाक्षरीत कराव्यात. त्या उपयोगिता प्रमाणपत्रांवर सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी प्रतिस्वाक्षरी करावी. अशी उपयोगिता प्रमाणपत्रेच शासनाला स्वीकारार्ह राहतील.

८) या वितरीत अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र म.जी.प्रा.ने शासनान सादर करावे.

९) वितरीत केलेल्या अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा आणि विहित अहवाल, विहित दिनांकास लेखाधिकारी, पापु-२० यांच्याकडे सादर करावा.

या शासन निर्णयान्वये वितरीत केलेले अनुदान प्राप्त करून घेण्यासाठी संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून तर सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

शासनाद्वारे देण्यात येणारे निवृत्तीवेतन अनुदान लाभार्थ्यांच्या बँक खात्यामध्ये ECS द्वारे प्रदान करणे बंधनकारक राहील. कोणत्याही परिस्थितीमध्ये निवृत्तीवेतन अनुदानाची रक्कम एकत्रितरित्या व Offline पद्धतीने वितरीत करण्यात येऊ नये.

प्रस्तुत प्रकरणी होणारा खर्च "मागणी क्रमांक वाय-२, २२१५- पाणी पुरवठा व स्वच्छता, १९९- इतर अशासकीय संस्थांना सहाय्य, ०१- इतर अशासकीय संस्थांना सहाय्य, (०१) (०४) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे वर्ग झालेल्या शासकीय कर्मचाऱ्यांना निवृत्तीवेतनाचे लाभ मंजूर करण्यासाठी शासकीय अनुदान (२२१५A०५२) (अनिवार्य/दत्तमत), ३१- सहाय्यक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून सन २०१९-२० च्या आर्थिक तरतुदीमधून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय, वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक २८२/व्यय ३, दिनांक १८/११/२०१९ व अनौपचारिक संदर्भ क्रमांक ७/व्यय ३, दिनांक १०/०१/२०२० अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००१२४१५१४०३४८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=MAHARASHTRA, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, serialNumber=7268de40660971f80951c66d0e657e903b378196f51a978d2a366cf5eb564c0c, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2020.01.24 14:58:14 +05'30'

**(चेतन निकम)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,मुंबई.
२. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा), मुंबई/ नागपूर.
३. संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
४. उपसचिव (कार्यासन व्यय-३), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. उपसचिव (कार्यासन अर्थसंकल्प-१८), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. उपसचिव (पापु-०४), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. मुख्य प्रशासकीय अधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
८. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
९. निवडनस्ती, कार्यासन पापु-२३, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.